**महानिर्मिती कंपनीच्या भुसावळ औष्णिक केंद्र संच क्र. ४ व ५ (२X ५०० मे.वॅ.) प्रकल्पाच्या सुधारित खर्चासाठी व अतिरिक्त भागभांडवलासाठी मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प-२०१४/प्र.क्र.२६८/ऊर्जा-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ** : शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
१) क्रमांक : विनिकं-२००५/प्र.क्र.२०४४/ऊर्जा-४, दि. १२.०५.२००६
२) क्रमांक: प्रकल्प-०७१०/प्र.क्र.२६६/ऊर्जा-४, दि. २८.०४.२०११
३) क्रमांक : निधीवी-२०१५/प्र.क्र.१२१(२)/ऊर्जा-३,दि.३१.०३.२०१६
४) महानिर्मिती कंपनीचे पत्र क्र. पी.अॅन्ड पी./बीएसएल २ X ५०० मे.वॅ. प्रोजेक्ट/२०४५, दि. ०२.०९.२०१४

**प्रस्तावना :**

राज्यातील वीजेची वाढती मागणी लक्षात घेऊन भुसावळ येथे २X५०० मे.वॅ. क्षमतेचा औष्णिक विद्युत प्रकल्प उभारण्यासाठी, संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीस शासनाने मान्यता दिलेली होती. त्यानंतर संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक २ अन्वये सदर प्रकल्पाच्या सुधारित खर्चास व अतिरिक्त भागभांडवलास मंजुरी देण्यात आली आहे.

प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या दरम्यान पुरवठयातील तफावतीमुळे, बाजार मूल्यांकनात होणारे बदल तसेच प्रकल्पाच्या कामासाठी लागणाऱ्या साधनसामुग्रीच्या किंमतीमध्ये व निर्देशांकात झालेली वाढ इ. कारणांमुळे प्रकल्पाच्या खर्चात वाढ झालेली आहे. त्यामुळे सुधारित वाढीव भागभांडवलास मंजुरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक ४ येथील प्रस्ताव दिनांक १८.०१.२०१७ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर बैठकीत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने खालील निर्णय शासनाने घेतले आहेत.

२. महानिर्मिती कंपनीच्या भुसावळ औष्णिक विद्युत केंद्र संच क्र. ४ व ५ (२X५०० मे.वॅ.) प्रकल्पाच्या सुधारित प्रशासकीय खर्च रुपये ६८९७.५० कोटीस व शासनाचे सुधारित भागभांडवल रुपये १३७९.५० कोटीस (२०%) खाली दर्शविल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशिल | एकूण प्रकल्प खर्च | ग्रामीण विद्युतीकरण महामंडळ/ इतर वित्तीय संस्थांकडून कर्ज | शासनाचे भागभांडवल |
|---|---|---|---|---|
| १. | शासनाने मान्यता दिल्यानुसार सुधारित प्रकल्प खर्च | ६४६४.८८ | ५१७१.९० | १२९२.९८ |
| २. | महानिर्मितीच्या प्रस्तावाप्रमाणे सुधारित प्रकल्प खर्च | ६८९७.५० | ५५१८.०० | १३७९.५० |
| ३. | वाढीव खर्च | ४३२.६२ | ३४६.१० | ८६.५२ |

अ) महानिर्मिती कंपनीच्या भुसावळ औष्णिक केंद्र संच क्र. ४ व ५ (२X५०० मे.वॅ) प्रकल्पाच्या सुधारित वाढीव खर्चानुसार एकूण रुपये ४३२.६२ कोटी इतक्या अतिरिक्त रक्कमेपैकी ८० टक्के रक्कम रुपये ३४६.१० कोटी ग्रामीण विद्युतीकरण महामंडळाकडून तसेच इतर वित्तीय संस्थांकडून कर्ज रुपाने उपलब्ध करुन घेण्यास महानिर्मिती कंपनीस मान्यता देण्यात येत आहे.

ब) वाढीव खर्चापैकी उर्वरित २० % प्रमाणे रुपये ८६.५२ कोटी राज्य शासनाकडून भागभांडवलाच्या स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. यापैकी रुपये ४३.५३ कोटी इतकी रक्कम सन २०१५-१६ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करुन सुधारित प्रकल्प खर्चापोटी देय असलेल्या २०% भागभांडवलाच्या रुपये ८६.५२ कोटी रकमेपैकी, रुपये ४३.५३ कोटी इतकी रक्कम सन २०१५-१६ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करुन शासनास देय असलेल्या रकमेच्या पुस्तकी समायोजन करण्याच्या अटीच्या अधीन राहून उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ अन्वये महानिर्मितीस वितरीत करण्यात आलेले आहे. उर्वरित भागभांडवलाची रक्कम रुपये ४२.९९ कोटीची तरतूद सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात करण्यात आली असून ती शासनास देय असलेल्या रकमेचे पुस्तकी समायोजन करण्याच्या अटीच्या अधीन राहून महानिर्मितीस वितरित करण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबीवरील खर्च “मागणी क्र. के -११, ४८०१ वीज प्रकल्पावरील इतर भांडवली खर्च, ०२ औष्णिक विद्युत निर्मिती, १९०सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०० इतर खर्च (०१) राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०५) भुसावळ औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये भांडवली गुंतवणूक (४८०१ ३५३५) या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक : २६६/१६/व्यय-१६, दिनांक ११.११.२०१६ व नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक:२४४/१४६१, दिनांक १७.०७.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०८१४५५०११११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.02.08 14:57:03 +05'30'

**( भि.य. मंता )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (ऊर्जा) मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखावअनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५ निवासी लेखाधिकारी, मुंबई
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१७. मुख्य लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, मुंबई
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कं.मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधार कंपनी मर्या.,प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१

२२. वित्त विभाग (व्यय-१६, अर्थसंकल्प शाखा)

२३. नियोजन विभाग (कार्यासन-१४८३)

२४. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने

२५. निवडनस्ती (ऊर्जा-४).